नागपूर महसुल विभागांतर्गत विभागीय आयुक्त, नागपूर व त्याअंतर्गत जिल्हा पातळीवरील प्रकल्पाच्या पुनर्वसित गावठाणात पुनर्वसनाच्या कामासाठी असलेल्या एकूण ३३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - आरपीए-२०१९/प्र.क.५५/र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक- २४ एप्रिल, २०२३

**वाचा:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. आरपीए-२००८/प्र.क.४३२/र-१, दि.२८/०१/२०१०

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. आरपीए-२०१९/प्र.क.५५/र-१, दि.१५/०३/२०२२

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.०८/०२/२०२३

४) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र. गोप्रविका/पदांना मुदतवाढ/कावि-१५/२०२३, दि.०८/०२/२०२३

**प्रस्तावना :-**

नागपूर महसुल विभागांतर्गत विविध पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित झालेल्या प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ३३ अस्थायी पदांना संदर्भ क्र.०२ अन्वये दि.०१/०९/२०२२ ते दि.२८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदत संपुष्टांत आल्याने पुढील मुदतवाढ देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

मदत व पुनर्वसन उपविभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय स्तरावरील पदांचा आढावा घेण्यात आला असून उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेनूसार पुनर्वसन आस्थापनेवरील नागपूर विभागातील एकूण ३३ पदांचा आकृतीबंध संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केला आहे. संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३ पर्यंतची मुदतवाढ प्रदान करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यानूसार खालील नमूद नागपूर विभागातील एकूण ३३ पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढीस मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनाम व वेतनश्रेणी | **विभागीय आयुक्त व जिल्हा स्तरावरील मंजूर पदे (कार्यरत पदे** | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | आयुक्त नागपूर | जिल्हा नागपूर | जिल्हा वर्धा | जिल्हा भंडारा | जिल्हा चंद्रपूर | **एकूण** |
| १ | उपायुक्त (पुनर्वसन) (एस-२५, ७८८००-२०९२००) | १ | ० | ० | ० | ० | **१** |
| २ | उपजिल्हाधिकारी (पुनर्व) (एस-२०, ५६१००-१७७५००) | ० | १ | १ | १ | १ | **४** |
| ३ | तहसिलदार (पुनर्व) (एस-१९, ५५१००-१७५१००) | १ | ० | १ | ० | ० | **२** |
| ४ | उपलेखापाल (एस-१३, ३५४००-११२४००) | १ | ० | ० | ० | ० | **१** |
| ५ | राजस्व निरीक्षक (एस-१२, ३२०००-१०१६००) | ० | १ | १ | १ | १ | **४** |
| ६ | अव्वल कारकून (एस-१२, ३२०००-१०१६००) | १ | १ | १ | १ | १ | **५** |
| ७ | लघु टंकलेखक (एस-८, २५५००-८११००) | १ | ० | ० | ० | ० | **१** |
| ८ | तलाठी (एस-८, २५५००-८११००) | ० | १ | ० | १ | १ | **३** |
| ९ | लिपिक टंकलेखक (एस-६, २५५००-८११००) | १ | १ | १ | १ | १ | **५** |
| १० | वाहन (एस-६, २५५००-८११००) | १ | ० | ० | ० | ० | **१** |
| ११ | शिपाई (एस-१, १५०००-४७६००) | २ | १ | १ | १ | १ | **६** |
| | **एकूण पदे** | **९** | **६** | **६** | **६** | **६** | **३३** |

३. उपरोक्त ३३ पदे अस्थायी स्वरुपाची असून ती पदे संबंधित विभागाच्या स्थायी पदांबरोबर अतिरिक्त पदे म्हणून मानण्यात यावीत. तसेच सदरहू पदांबरोबर पदधारक शासनाच्या नियमानुसार महागाई भत्ते व इतर पुरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील. तसेच, उपरोक्त पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नव्हती, या धारणेच्या अधीन राहून मुदतवाढीस शासनाने मंजूरी दिली आहे.

४. सदरहू पदापैकी आयुक्त कार्यालयातील पुनर्वसनासाठी मंजूर केलेल्या कर्मचारी वृदांचा खर्च मागणी क्रमांक सी-५ मुख्य लेखाशिर्ष *२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण (०१)प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन (०३) पुनर्वसन (२०२) (०३) (०४) (योजनेत्तर-२२३५१९०६) तसेच जिल्हा स्तरावरील कर्मचाऱ्यांचा खर्च मागणी क्र. सी ०५, मुख्य लेखाशिर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण (०१) राज्य योजनांतर्गत योजना प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन (०४) पुनर्वसन (२०२) (०४)(०४) (योजनांतर्गत-२२३५१९६२) या लेखाशिर्षाखाली सन २०२-२०२२ मध्ये खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००१- २०२२ च्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८/०२/२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२४१३४८५२३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.04.24 13:55:53 +05'30'

**( चु. रा. निखारे )**
कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग

**प्रति,**

१) महालेखापाल १/२, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
४) उपआयुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर
५) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन संचालक, नागपूर / भंडारा/चंद्रपूर/वर्धा/गडचिरोली
६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/भंडारा/वर्धा/गडचिरोली / चंद्रपूर
८) कक्ष अधिकारी र-८/ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (आपुक), मंत्रालय,मुंबई-३२
१०) निवडनस्ती र १ कार्यासन.